The Mathadi Act came into being to regulate the employment of unprotected manual workers employed in certain establishments in the State of Maharashtra. Currently the retail industry employs many people for various functions in retail business including for jobs like loading / unloading of merchandise in the retail stores and distribution centers. They are protected workforce and are either employees of the retailer or are from authorized contractors.

Exercising the power conferred under the Section 22 of The Maharashtra Mathadi, Hamal And Other Manual Workers (Regulation Of Employment And Welfare) Act, 1969 State Government shall exempt retail enterprise from the provision of this act provided that:

i. The said classes of the establishments employ the workers on their rolls as permanent employees. These workers are protected and enjoy better benefits than envisaged in the Mathadi Act.

ii. The said classes of the establishments engage contract workers as permanent employees who are getting all the benefits under various sections of the Labour law and enjoy better benefits than envisaged in the Mathadi Act.

## K. Permission for Store Sign Boards displaying Trade names of the company

According to Mumbai Municipal Corporation Act-1888, Maharashtra Municipal Corporations Act & Maharashtra Municipal Council & Nagarpanchayat Act 1965 permission of the Commissioner or Chief Officer of Municipal Council or authorized person of Special Planning Authority is required for displaying advertisement hoardings by means of surface or structure erected on ground or any portion of a roof of a building or on/above the parapet, with characters, letters or illustrations applied thereto and displayed in any manner along with payment of prescribed fees.

Sky-signs are mainly set up for advertising, which is an integral component of every retail store. As long as the sky sign is fixed in and out of the self-owned, leased or mortgaged premise of the retail store, by the trader advertising his own business it shall not attract the requirement of permission of the Commissioner or Chief Officer or Competent Authority and payment of fees. This will not be applicable if a trader is advertising for some one’s else business.

## L . Allowing Open Access to Source Electricity

-The modern retail outlets have large electric power requirements. Power bill substantially affects the overall operations of the trade. The retail trade set-ups having power requirements above 1 MW will be allowed open access.

## M. Management Framework for Policy Implementation

### (1) Constitution of Empowered Committee:

An empowered committee will be constituted at the state level to monitor the implementation of this Policy, and develop procedures and modalities where required. The composition of the empowered committee will be as follows:

i. Chief Secretary – Chairperson
ii. Principal Secretary – (Industries) – Member
iii. Principal Secretary – (Urban Development -I) – Member
iv. Principal Secretary – (Skill Development) – Member
v. Principal Secretary – (Labour) – Member
vi. Principal Secretary – (Food & Civil Supplies) – Member
vii. Principal Secretary - (Revenue) - Member
viii. Secretary (Urban Development- II) – Member
ix. Three Nominees of the activeretailer's associations in the state – Member
x. Development commissioner (Industries) – Member Secretary

**(2) Charter of the Empowered Committee:**

The Empowered Committee will constitute a Task Force for coordinating and implementing the instruments in respect of the following key areas of the policy:

i. Promotion of Retail Zones
ii. Promotion of Green Retail
iii. Initiatives related to laws and regulations for ease of doing business
iv. Human Resource Development
v. Administrative measures

**6. Policy Applicability and Validity :**

The policy will be applicable to new retail business after this policy comes into force. The policy will be valid for five years.

**********

## परिशिष्ट-१

## महाराष्ट्राचे किरकोळ व्यापार धोरण-२०१६ .

### १. प्रस्तावना

किरकोळ व्यापार हा भारतीय अर्थव्यवस्थेच्या एक आधारभूत स्तंभ आहे आणि त्याचा स्थुल ढोबळ उत्पन्नामधील (जीडीपी) वाटा सुमारे १५% इतका आहे. भारतीय किरकोळ व्यापार अंदाजे ५००अब्ज अमेरिकन डॉलर इतका आहे आणि आर्थिक मूल्यानुसार तो जगातील पहिल्या पाच किरकोळ बाजारांपैकी एकआहे. १.२ अब्ज लोकसंख्या आणि वाढता मध्यमवर्ग असलेला भारत, जगातील सर्वात वेगात वाढणाऱ्या किरकोळ बाजारापैकी एक आहे.

सन २०१५ पर्यंत भारतीय किरकोळ व्यापार उद्योगाचे स्वरुप प्रामुख्याने मालकांनी चालविलेले लहान दुकाने असा आहे. सन २०१० मध्ये मोठ्या स्वरूपातील कनव्हीनियंस स्टोअर्स आणि सुपर मार्केटयांचा उद्योगातील वाटा सुमारे ४ टक्के इतका होता, आणि सदर स्टोअर व सुपर मार्केट हे फक्त मोठ्या शहर संकुलामध्येच अस्तित्वात होते. भारताचा किरकोळ व्यापार आणि लॉजिस्टिक उद्योग हा सुमारे ४० दशलक्ष लोकांना रोजगार पुरवतो. (भारतीय लोकसंख्येच्या ३.३%)

वाढता मध्यमवर्ग हा भारतातील किरकोळ व्यापारवाढीस योगदान देणारा महत्वाचा घटक आहे. आजमितीस २१ दशलक्ष असलेली मध्यम वर्गकुंटुंबाची संख्या वाढून सन २०३० पर्यंत ९१ दशलक्ष इतकी होईल असे अंदाजित आहे. तसेच सन २०३० पर्यंत भारतातील सुमारे ५७० दशलक्ष लोक हे शहरांमध्ये राहत असतील, जे अमेरिकेच्याआजच्या लोकसंख्येच्या जवळजवळ दुप्पट असेल अशी अपेक्षा आहे.

वर्षभरात तरुणांकडून होणारा उच्च ग्राहक खर्च (५०% पेक्षा अधिक लोकसंख्या २५वर्षेखालील आहे) आणि डिस्पोजेबल इनकम मध्ये होत असलेली तीव्र वाढ या बाबी भारतात संघटित किरकोळ बाजारक्षेत्राच्या विकासासाठी कारणीभूत ठरत आहेत. वर्ग-१ व वर्ग-२ ची शहरे व नगरे ग्राहकांच्या आवडीनिवडीतील आणि जीवनशैली यामध्ये झालेल्या मोठया बदलांची साक्षीदार आहेत, परिणामी ती किरकोळ क्षेत्राच्या आकर्षक बाजारपेठा म्हणून उदयास आल्या असून त्यामुळे किरकोळ व्यापाऱ्यांना त्यांचे अस्तित्व विस्तृत करण्यास वाव आहे.

भारतीय किरकोळ विक्री क्षेत्र हे मोठ्या प्रमाणात विखुरलेले आणि असंघटित स्वरुपाचे असून त्यातसुमारे १३ दशलक्ष रिटेल आऊटलेट्स चा समावेश असून त्यात एकूण भारतीय रिटेल उद्योगाच्या सुमारे ९६% इतका वाटा आहे. तथापि, भविष्यात संघटित क्षेत्रात जागतिकीकरण, आर्थिक वाढ आणि सुधारित जीवनशैली यामुळे संभाव्य वाढ होण्याची अपेक्षा आहे.

महाराष्ट्र राज्य हे किरकोळ व्यवसायामधील एक अग्रगण्य राज्य आहे. किरकोळ व्यापारामध्ये किरकोळ वस्तू विक्री आणि सेवा पुरवणा-या उपक्रमांचा समावेश होतो. हे उपक्रम विविध प्रकारात मोडतात जसे अन्न आणि किराणा, कपडे, पादत्राणे, ग्राहकोपयोगी वस्तू, घरगुती साधने व उपकरणे, उपहारगृह सिनेमा हॉल, मल्टिप्लेक्स, होम फर्निशिंग आणि फर्निचर, दागिने, पुस्तके, संगीत, घड्याळे, औषधे,

सौंदर्यप्रसाधने आणि हेल्थ केअर इ. हे उपक्रम विविध वर्गवारीतील वस्तुंची विक्री करतात आणि एकापेक्षा अधिक मार्गांचा विक्रीसाठी वापर करतात. जसे ब्रीक ॲण्ड मॉर्टर, थेट विक्री, ई-कॉमर्स आणि इतर मार्ग.

किरकोळ वितरण केंद्र हे महाराष्ट्रातील उत्पादक आणि ग्राहक यांच्या दरम्यान महत्त्वपूर्ण गतीमान आणि उत्क्रांत स्वरुपाचा दुवा प्रदान करणारे आहे. निम्न स्तरावर किरकोळ उपक्रम (Enterprise) हे रोजगारासाठी भरीव योगदान देतात. राष्ट्रीय अर्थव्यवस्थेतील दुसरा क्रमांक असलेला हा विशाल उपक्रम एकाच वेळी व्यवसाय आणि जीडीपी या दोहोंमध्ये लक्षणीय योगदान प्रदान करतो.

## २. धोरणाची कार्यतंत्रे

अर्थव्यवस्थेच्या वाढीसाठी थेट योगदान देत असल्याने किरकोळ व्यापार महत्वाचा आहे. धोरणाच्या कार्यतंत्रामध्ये खालील बाबींचा समावेश होतो :

अ) रोजगाराच्या संधींची निर्मिती

ब) तळातील (ग्रास रुट) उद्योजकतेचे प्रवर्तन

क) महिलांचे सबलीकरण

ड) शेतकऱ्यांचे सबलीकरण

इ) 'मेड इन इंडिया' वस्तुंचे उत्पादन करणाऱ्या उद्योगांसाठी मागणी निर्माण करणे आणि त्यांना समर्थन पुरविणे.

फ) किरकोळ व्यापारातील सूक्ष्म, लघु व मध्यम उप्रक्रमांची वाढ

ग) सरकारी तिजोरीत (Exchequer) भर

ह) भाव स्थिर राखणे आणि ग्राहकांना विविध वस्तु प्रस्तुत करणे.

सन २०१३-१४ मध्ये महाराष्ट्राचे स्थूल राज्य देशांतर्गत उत्पादन (GSDP) चालू दरानुसार रुपये १३,२३,७६८ कोटी होते. ते भारताच्या जीडीपीच्या १४.१ टक्के होते जे (भारताच्या) सर्व राज्यांमध्ये सर्वाधिक होते. राज्याची राजधानी असलेली मुंबई, ही भारताची व्यवसायिक राजधानी असून ती जागतिक आर्थिक केंद्र म्हणून उदयास येत आहे. महाराष्ट्रातील किरकोळ व्यापाऱ्यांच्या उपक्रमांमध्ये झालेली अभूतपूर्व वाढ आणि त्याची राज्याची अर्थव्यवस्था व रोजगार यास चालना देण्याची असलेली क्षमता तसेच अलीकडील बदलांना सामोरे जाण्यासाठी व किरकोळ व्यापार क्षेत्राचा सर्वसमावेशक दृष्टीने विचार करुन प्रथमच राज्याचे किरकोळ व्यापार धोरण तयार करण्यात आले आहे.

## ३. किरकोळ विक्रेत्याची व्याख्या

किरकोळ विक्रेता म्हणजे वस्तू विकणारा किंवा अंतिम ग्राहकाला सेवा प्रदान करणारे कोणतेही वेगळे अस्तित्व असणारी व्यक्ती किंवा वस्तु होय. अंतिम उपभोक्ता (end consumer) म्हणजे वैयक्तिक वापरासाठी किंवा सेवनासाठी वस्तु विकत घेणारी व्यक्ती होय. सबब, किरकोळ विक्रेता म्हणजे अंतिम उपभोक्त्यांशी व्यवहार करणारा, अशा अंतिम उपभोक्त्यांचा तपशील ठेवणारा आणि अंतिम उपभोक्त्यांना सेवा पुरविण्याची जबाबदारी असलेली व्यक्ती होय. अशा वस्तूंची विक्री विविध मार्गाव्दारे (channels) होते, ज्यामध्ये ब्रीक ॲण्ड मॉर्टर, थेटविक्री, ई-कॉमर्स,

दूरदर्शन, मोबाइल फोन किंवा टॅबलेट आणि इतरमार्गाचा (channels) समावेश होतो. कोणतेही अस्तित्व किंवा ब्रँडयांनी अंतिम ग्राहकास स्टोअर, किरकोळ विक्रेता किंवा विक्रेता म्हणून स्वत:हास दर्शित केल्यास आणि त्याद्वारे ग्राहकाच्या मनात सेवेची अपेक्षा निर्माण केल्यास त्यास किरकोळ विक्रेता म्हणून संबोधले जाईल.

"मल्टी ब्रँड रिटेल" किंवा "सुपरमार्केट" किंवा "हायपरमार्केट" म्हणजे जेथे एकाच छप्पराखाली विविध वस्तुंची विक्री केली जाते ती ठिकाणे होय, उदा.बिगबझार, सेंट्रल, इनऑरबिट इत्यादी.

"सिंगल ब्रँड रिटेलर "म्हणजे अशा व्यक्ती / आस्थापना जो स्वत:चा ब्रँडेड माल स्वतःच्या दुकानांमध्ये विकणारा होय. 'सिंगल ब्रँड रिटेलर' हे स्वत:च्या मालकीची पुरवठा साखळी असते आणि तो वस्तुंचा उत्पादक, पॅकींग करणारा, आयातदार आणि घाऊक विक्रेता असतो. उदाहरणार्थ — आयकेईए, Decathlon, इत्यादी.

## ४. किरकोळ व्यापार धोरण २०१६ चा दृष्टीकोन, अभियान आणि उद्दिष्टे

**दृष्टीकोन :** कार्यक्षम आणि एकसंघ अशा देशांतर्गत व्यापाराच्या संधी निर्माण करण्यासाठी आणि जागतिक दर्जाच्या लॉजिस्टीक व वेअरहाऊसच्या साखळीतून सुविधा पुरवून तसेच किरकोळ उपक्रमामधील व्यवहाराचा खर्च कमी करुन, एकाचवेळी अंतिम ग्राहकास पैशाच्या सर्वोत्तम मुल्यात वस्तु पुरवून त्याचवेळी उत्पादक, विशेषतः शेतकरी आणि सुक्ष्म व लघु उपक्रमांना कमाल परतावा मिळवून देऊन राज्याची आर्थिक स्पर्धात्मक क्षमता वाढवून राज्याच्या अर्थव्यवस्थेला चालना देणे.

**अभियान :** जागतिक दृष्टया स्पर्धात्मक आणि शाश्वत गुंतवणुक पर्यावरण पुरविण्यासाठी प्रवर्तक निती तयार करणे, जेणेकरुन महाराष्ट्र हे जागतिक तसेच देशातील एक सर्वाधिक पसंतीचे आर्थिक आकर्षण आणि अमर्यादित संधीचे केंद्र बनेल.

**धोरणाची उद्दिष्टे** : किरकोळ व्यापार धोरण- **२०१६** ची उद्दिष्टे पुढीलप्रमाणे :

अ) देशांतर्गत महाराष्ट्राचे किरकोळ व्यापार क्षेत्रात अग्रस्थान प्रस्थापित करणे.

ब) राज्यातील कमी विकसित विभागात गुंतवणूकीचा ओघ आणखी वाढविण्यासाठी चालना देणे.

क) राज्याच्या सर्व विभागातील, समाजाच्या सर्व स्तरातील, विशेषत: ग्रामिण भागातील तरुणांना किरकोळ व्यापार क्षेत्रात प्रशिक्षित करुन रोजगाराच्या अधिक संधी निर्माण करणे.

ड) राज्याच्या सामाजिक-आर्थिक विकासाकरिता किरकोळ व्यापार क्षेत्राचा एक साधन म्हणून वापरणे.

इ) जागतिकीकरणाला तोंड देण्यासाठी अस्त्विात असलेल्या असंघटीत लहान किरकोळ विक्रेत्यांचे बळकटीकरण करणे :-

## ५. धोरणातील पुढाकार

सुशिक्षीत बेरोजगार युवक त्याचप्रमाणे आधुनिक रिटेल अल्पशिक्षित आणि / किंवा आर्थिकदृष्ट्या मागासलेल्यांना रोजगार संधी उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच उपभोक्त्यांना उन्नती किंवा उपयोग आणि मागणी याव्दारे, एक पोषक वातावरण निर्माण करण्यास मदत होईल.

शहरांच्या पुर्नरुत्थानामध्ये रहिवाशांना खरेदीच्या सोयीसुविधा उपलब्ध करून देऊन, सार्वजनिक आणि खाजगी क्षेत्राकडून होणाऱ्या लक्षणीय गुंतवणूकीस किरकोळ विक्रीव्दारे सहाय्य करण्यात येते. रिटेल-क्लस्टर्सचा विकास झाल्यास राज्यातील दुर्गम भागांच्या सांस्कृतिक, नागरी आणि आर्थिक विकासास मदत होईल.

पर्यटनाच्या संदर्भात देखिल ही बाब महत्वाची आहे. अशी लहान शहरे आणि गावे नंतर विविध सुविधा आणि सेवा पुरवून आसपासच्या ग्रामीण भागाच्या विकासासाठी उपयोगी पडतात.

आर्थिक प्रगतीमुळे आणि किरकोळ व्यापारामध्ये होत असलेल्या बदलांमुळे महाराष्ट्रातील किरकोळ व्यापाराचे स्वरुप व प्रमाण यात मोठे बदल घडून येत आहेत. किरकोळ व्यापार क्षेत्राच्या नियोजनाच्या विवक्षित गरजा अनुक्रमे प्रादेशिक नियोजन व विकासात्मक कार्ये, राज्यातील प्रादेशिक प्राधिकारी व नियोजन प्राधिकरण यांनी पार पाडावयाची आहेत.

किरकोळ उपक्रमांच्या वाढीसाठी एक पोषक वातावरण पुरविण्याकरिता विविध प्रकारचा पुढाकार घेणे आवश्यक राहील. राज्यातील किरकोळ उपक्रमास त्याची खरी क्षमता गाठण्यासाठी, सद्याच्या नियामक चौकटीमध्ये काही अपवाद व शिथिलीकरण (relaxations) करणे आवश्यक आहे.

किरकोळ व्यापार धोरणात खालीलप्रमाणे उपक्रमशीलता हाती घेण्यात येतआहेत:

अ) एक खिडकी निपटारा सुविधेसाठी, महाराष्ट्र शासनामध्ये नोडल अधिकाऱ्याची नियुक्ती करणे.

ब) कामगार कायद्याचे सुलभीकरण — कामाचे तास, कामाच्या पाळया, अर्धवेळ कर्मचा-यांच्या नेमणुका आणि नोंदवहया ठेवणे या संदर्भात दुकाने व आस्थापना अधिनियमातील तरतूदी शिथिल करणे.

क) खाद्य व किराणा व्यवसायातील फक्त नाशवंत मालाचा समावेश अत्यावश्यक सेवेमध्ये अंतर्भाव करणे.

ड) जीवनावश्यक वस्तू कायदयांतर्गत (ESSCOM) असलेल्या साठवणूक मर्यादेमध्ये (Stocking Limits) शिथिलता आणणे.

इ) किरकोळ उपक्रमांमध्ये, मानव संसाधन विकास आणि कौशल्य विकास करणे.

फ) पॅकेज्ड कमॉडीटी नियमांची व्यवहारिकरित्या अंमलबजावणी करणे.

ग) किरकोळ करमणूक क्षेत्रांची (Retail Entertainment Zones (REZ)) निर्मिती करणे.

ग (१) प्रादेशिक / नगर नियोजन आराखडयात स्वतंत्रा क्षेत्राची तरतुद करणे.

ग(२) विकास नियंत्रण नियमावलीत अनुरुप सुधारणा करणे.

ग(३) किरकोळ व्यापार क्षेत्राकरिता अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांक अनुज्ञेय करणे.

ह) वितरण केंद्रांना उद्योगांच्या समकक्ष (atpar) दर्जा देणे.

ई) कृषी उत्पन्न बाजारसमिती नियमनातून सूट देणे.

ज) माथाडी कामगाराच्या वापरासंदर्भात, स्पष्ट कार्यान्वयन मार्गदर्शक तत्वे तयार करणे.

ख) कंपनी व्यवसायाच्या ठिकाणी, कंपनीचे व्यवसायिक नाव प्रदर्शित करणारा दुकानाचा बोर्ड लावण्यासाठी लागणारी पूर्व परवानगी आणि आकारणी /शुल्क यातून किरकोळ व्यापारास वगळणे.

ल) वीजेकरीता ओपन ॲक्सेसची अनुमती देणे.

म) राज्य पातळीवर एक शक्तीप्रदान समितीचे गठन करुन त्याव्दारे धोरणाच्या अंमलबजावणीचे सनियंत्रण करण्यात येईल. आणि त्यासाठी जेथे आवश्यक आहे तेथे कार्यपद्धती विकसित करण्यात व आवश्यकता भासल्यास सुधारणा करण्यात येईल.

**(अ) समन्वय (नोडल) अधिकाऱ्याची नियुक्ती :-**

उद्योग विभागाच्या अखत्यारितील “मैत्री” (महाराष्ट्र उद्योग, व्यापार आणि गुंतवणूक सुविधा सेल) मार्फत एका अधिकाऱ्याची महाराष्ट्रातील किरकोळ उद्योजकांना सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी ‘नोडल’ अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येईल. सदरचा नोडल अधिकारी किरकोळ उपक्रमांचा विकास आणि वाढ होण्यासाठी तसेच त्यांना लागणाऱ्या विविध परवानग्या सुकरतेने मिळण्यासाठी राज्यातील सर्व विभाग आणि मंत्रालयातील विभाग तसेच केंद्र सरकार आणि उद्योगांचे प्रतिनिधी यांच्यामध्ये, समन्वय घडवून आणेल. महाराष्ट्राचा उद्योग, व्यापार आणि गुंतवणूक सुविधा सेल (मैत्री) हा राज्यातील लहान आणि संघटित रिटेल उद्योगांनी उपस्थित केलेल्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी सहाय्य करेल. नोडल अधिकारी किरकोळ विक्रेत्यांच्या वतीने लागणारे परवाने कार्यक्षमतेने जलद प्राप्त होण्यासाठी राज्यातील संबंधित परवाना अधिकाऱ्यांशी संपर्क साधेल. जे कायदे व नियम उपयुक्ततेच्या दृष्टीने कालबाहयझाले आहेत त्यासंदर्भात नोडल अधिकारी बदल सुचवेल. किरकोळ उपक्रम स्थापन करण्यासाठी आणि चालविण्यासाठी लागणाऱ्या विविध प्रकारच्या मंजूरी, परवानगी, परवाना, नोदणी व त्यांचे नूतनीकरण इत्यादी ऑनलाईन पध्दतीने विना किंवा किमान हस्तक्षेपासह बनविण्यासाठी प्रयत्न करण्यात येईल.

**ब) दुकाने व आस्थापना अधिनियमातील तरतूदी शिथिल करणे** :

(I) ज्या लघु व मध्यम किरकोळ व्यापाऱ्यांच्या आस्थापना स्वयंरोजगारीत (Self employed) असतील, अथवा ज्या आस्थापनामध्ये नऊ (९) पेक्षा कमी कामगार कार्यरत असतील अशा आस्थापनांसाठी खालीलप्रमाणे सुलभता करण्यात यावी :-

१) दुकाने व आस्थापना अधिनियम १९४८ अंतर्गत ऑनलाईन नोदणी (Online Registration) ची सुविधा देण्यात येईल. याकरिता तपासणी (Inspection) अथवा कामगार कायद्यान्वये अन्य मंजूरीची आवश्यकता राहणार नाही.

२) मूल्यवर्धित कर (Vat) ची नोंदणी देखील ऑनलाईन (Online ) पध्दतीने देण्यात येईल. त्यासाठी तपासणी (Inspection) ची आवश्यकता राहणार नाही.

३) एखादया प्रकरणात विशिष्ट स्वरुपाची तक्रार प्राप्त झाल्यास, जिल्हास्तरीय अधिकारी यांचे पूर्व मान्यतेशिवाय कामगार विभाग, विक्रीकर विभाग इत्यादी विभागाकडून दूकानांची सर्वसाधारण तपासणी (Inspection) केली जाणार नाही.

(II) कामाचे तास, कामाच्या पाळया, अर्धवेळ कामगारांना रोजगार व नोंदवहया ठेवणे या संबंधित दुकाने व आस्थापना अधिनियमात असलेल्या तरतूदीत खालील शिथिलता आणण्यात येतील :

i. किरकोळ उपक्रमांना वर्षभर प्रत्येक दिवशी खुले राहण्याची अनुमती देण्यात येईल ज्याव्दारे कामगारवर्ग आणि इतर वर्गांच्या ग्राहकांच्या गरजा पूर्ण करणे शक्य होईल. परंतु सर्व कर्मचाऱ्यांना पसंती क्रमानुसार साप्ताहिक सुटी देणे अनिवार्य असेल.

ii. जे किरकोळ उपक्रम सर्व वस्तु आणि माल यांचा व्यवहार करतात त्यांना सकाळी ५ ते रात्री ११ वाजेपर्यंत व्यवसाय करण्याची मुभा देण्यात येईल. तसेच फक्त लॉजिस्टिक्स आणि पुरवठा या कारणांसाठी हे उपक्रम रात्री ११ ते सकाळी ५ वाजेपर्यंत खुले राहू शकतील.

iii. महिला कर्मचाऱ्यांना रात्री १० वाजे पर्यंत काम करण्याची परवानगी देण्यात येईल, परंतु या कालावधीत सुरक्षितते संबंधीच्या सर्व उपाययोजनांची खबरदारी घेतली पाहीजे. रात्री उशिरापर्यंत काम करणे आवश्यक असेल अशावेळी त्यांना आपापल्या घरी सुरक्षितपणे पोहचविण्याची व्यवस्था संबंधित व्यवस्थापनाने केली पाहिजे. उशीरापर्यंतच्या शिफ्टमध्ये काम करायचे किंवा नाही हा निर्णय संबंधित महिला कर्मचाऱ्याचा असेल.

iv. किरकोळ उपक्रमांना भौतिक स्वरुपात (physical records) हजेरी आणि वेतन विषयक नोंद- वह्या ठेवण्यातून सूट देण्यात येईल तसेच विविध कामगार कायद्यांखाली ठेवावयाचे कर्मचाऱ्यांच्या संबंधातील अभिलेखे इलेक्ट्रॉनिक स्वरुपात ठेवण्याची आणि कामगार विभागाच्या संगणकीकरणाच्या प्रगतीला अनुसरुन विवरणपत्रे इलेक्ट्रॉनिक स्वरुपात स्वीकारण्याची तरतूद करण्यात येईल.

v. किरकोळ उपक्रमांना कामगार विभागातर्फे अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या १३ अधिनियमांखाली असलेली वार्षिक विवरणपत्रे स्व-प्रमाणित करण्याचा आणि एकत्रित दाखल करण्याचा पर्याय असेल.

१) महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम, १९४८

२) किमान वेतन अधिनियम, १९४८

३) वेतन प्रदान कायदा, १९३६

४) ॲप्रेन्टीसेस अधिनियम १९६१

५) कंत्राटी कामगार (नियमन व निर्मुलन)अधिनियम, १९७०

६) बालकामगार (प्रतिबंध व नियमन) अधिनियम, १९८६

७) ग्रॅच्युइटी प्रदान कायदा, १९७२

८) समान वेतन कायदा, १९७६

९) बोनस प्रदान कायदा, १९६४

१०) रोजगार विनिमय (रिक्तपदांबाबत सक्तीची अधिसूचना) कायदा, १९५९

११) कामगार भरपाई कायदा,१९२३

१२) आंतरराज्य स्थलांतरीत कामगार (रोजगार व सेवाशर्तीचे नियमन) अधिनियम, १९७९

१३) कारखाने अधिनियम, १९४८

vi. गृहिणी आणि विद्यार्थ्यांना अर्धवेळ कामावर नेमणुकीचा पर्याय : रिटेल उपक्रमातील कामगार जर पूर्ण वेळ काम करण्यासाठी तयार नसतील तर अशावेळी ते गृहिणी आणि विद्यार्थ्यांना अर्धवेळ रोजगार प्रदान करु शकतील. याकारणासाठी कामगारांची पुर्वसंमती घेतली जाईल. ताशी वेतनाचा दर हा किमान वेतन कायद्याच्या प्रमाणानुसार निश्चित केलेल्या किमान मासिक / दैनिक वेतन दराप्रमाणे असेल. अर्धवेळ काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत इतर कायदयातून सूट देण्यात येईल. किरकोळ घटक त्याच्या एकूण कर्मचाऱ्यांच्या २५% पेक्षा जास्त कर्मचाऱ्यांना अर्धवेळ कर्मचारी म्हणून कामावर ठेवू शकणार नाही.

**क) खाद्य व किराणा व्यवसायातील नाशवंत मालाचा 'अत्यावश्यक' सेवे (ESMA) मध्ये समावेश करणे :-**

खाद्य व किराणा विक्रेते यांच्यावर, नागरिकांना विशिष्ट सेवा पुरवण्याची जबाबदारी असते. त्यात अडथळा आल्यास त्याचा परिणाम सामान्य नागरिकांच्या जीवनावर होतो.

कधी कधी बंद सारख्या घटनांमुळे किरकोळ आस्थापनांना बंद ठेवणे अनिवार्य होते. यामुळे एकिकडे नागरीकांना वस्तु मिळण्यास अडथळा निर्माण होतो. तर दुसरीकडे किरकोळ विक्रेत्याच्या व अंतिमत: राष्ट्राच्या उत्पादनाची प्रचंड नासाडी होते. ही बाब विचारात घेता- खाद्य व किराणा व्यवसायातील फक्त "नाशवंत मालाचा" समावेश 'अत्यावश्यक' सेवेमध्ये अंतर्भाव करण्यात येत आहे.

**ड) जीवनावश्यक वस्तू कायदा (ESSCOM) अंतर्गत साठवणूक मर्यादेत (Stocking Limit) शिथिलता आणणे.**

अन्न व नागरी पुरवठा मंत्रालय अत्यावश्यक वस्तु अधिनियमांतर्गत जारी केलेले पूर्वीचे आदेश एकतर निरसित करेल किंवा विनिर्दिष्ट साठवणूक मर्यादेत वाढ करेल.

यासाठी खालीलमुद्दे विचारात घेतले जातील :

**i.** जीवनावश्यक वस्तु कायदयाच्या साठा मर्यादा परवाने आदेशाची (ESSCOM Orders) (अत्यावश्यक वस्तु) अंमलबजावणी करताना देशातील इतर राज्यांचा अनुभव लक्षात घेऊन सुसंगतीकरण करण्यात येईल.

ii. ज्या साठवणूक मर्यादेसाठी अनुज्ञप्ती घ्यावी लागते अशी मर्यादा वाढविण्यात येईल.

iii. अनुज्ञप्ती मिळविण्याची आणि त्याच्या नूतनीकरणासाठीच्या प्रक्रिया कमी करण्यात येईल आणि त्यामध्ये सुसुत्रीकरण करण्यात येईल.

iv. सध्या अत्यावश्यक (ESSCOM) वस्तुंच्या अंतर्गत अनुज्ञप्ती, कमोडिटी-नुसार लागू केली जात आहे आणि यासंबंधीच्या सूचनांमध्ये वारंवार बदल होतात. राजपत्रातील अधिसूचनेनुसार व्यापारास अद्यावत व्हावे लागते. तसेच कमोडिटी मर्यादा क्षेत्र निहाय (लोकसंख्या आधारित नगर / शहर / झोन वर्गीकरण) आणि श्रेणी निहाय (घाऊक / किरकोळ / प्रक्रिया, इ.) बनविण्यात आलेल्या असून त्याची अंमलबजावणी जटिल आणि क्लिष्ट आहे. त्यामुळे सदरची प्रक्रीया सुलभ व सुसंगत करण्यात येईल.

v. गोदामातील साठवणूकीच्या मर्यादा या ग्रामीण भागात शहरी भागापेक्षा जास्त पाहिजेत, कारण शहरी भागातील गोदामांच्या जागेचे दर महागडे असून, ते परवडणारे नाहीत.

vi. या स्टोअर्समध्ये येणा-या ग्राहकांची संख्या जास्त असल्याने मासिक विक्रीवर आधारित रिटेल साखळीतील स्टोअर्सना मोठी साठवणूक क्षमता अनुज्ञेय करण्यात येईल.

## इ) मानव संसाधन विकास आणि कौशल्य विकास

रिटेल उद्योगासाठी मानवी संसाधने विकास आणि कौशल्य विकास यावर विशेष भर देणे आवश्यक आहे. रिटेल व्यवस्थानाने प्रशिक्षित मनुष्यबळाच्या वापर करावा असा शासनाचा सल्ला आहे.

राज्याने चालवलेल्या संस्था आणि सुप्रसिद्ध खाजगी संस्था या प्रशिक्षण-आधारित सर्टीफीकेशन आणि प्लेसमेंट कार्यक्रम सुरु करतील. National Skills Qualification Framework नुसार निश्चित केलेला अभ्यासक्रम पूर्ण करणाऱ्या प्रशिक्षित कर्मचाऱ्यांची नियुक्ती करणे हया धोरणाचा लाभ घेऊ इच्छिणाऱ्या किरकोळ व्यापाऱ्यांना अग्रक्रम राहिल. अशा संस्था

संसाधनाच्या गरजा समजून किरकोळ विक्रेत्यांच्या संघटना तसेच स्थानिक रिटेल उद्योग यांचा सहयोग घेतील. वरील आवश्यकतेच्या आधारे गुणवत्तेनुसार परिभाषित सर्टीफीकेशन आणि प्लेसमेंट प्रक्रिया सुरू असलेल्या संस्थेमार्फत किरकोळ उपक्रमासाठी सुयोग्य मनुष्यबळ निर्माण करण्यात येईल. हि बाब जे लहान उद्योग इन हाऊस आवश्यक प्रशिक्षण देण्याच्या स्थितीत नाहीत त्यांच्यासाठी विशेषतः महत्वाची आहे.

शक्तीप्रदान समितीच्या अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या कार्यबल समिती (टास्कफोर्स) मार्फत व्यवहार्यता मूल्यांकन आणि इतर तपशीलावर आधारित, सेंटर ऑफ एक्सलेंन्स, फिनिशिंग स्कुल आणि इतर रोजगार देणाऱ्या केंद्राची स्थापना करण्याचा प्रस्ताव तयार करण्यात येईल.

i. **आदिवासी व ग्रामीण युवकांसाठी कौशल्य विकास कार्यक्रम :** ही योजना आदिवासी आणि ग्रामीण तरुणांचा आर्थिक आणि सामाजिक विकास घडवून आणण्यासाठी विविध कौशल्य आणि ज्ञान विकसित करण्यासाठी प्रस्तावित करण्यात आली आहे. आदिवासी आणि ग्रामीण युवकांना किरकोळ उपक्रमातील विविध क्षेत्रात जसे किरकोळ मार्केटिंग , मानवी संसाधन विकास आणि आरोग्य संवर्धन याबाबतचे प्रशिक्षण त्यांच्या नियमित योजनांमधून दिले जाईल. इतर क्षेत्रात रोजगाराचा अभाव हे भारतातील बेरोजगारीचे एक प्रमुख कारण आहे. त्यामुळे अशा तरुणांना रोजगार निर्माण करणारे किरकोळ उपक्रम हे यर्थाथ साधन आहेत. ५ वर्षांच्या कालावधीत एक लाख युवकांना प्रशिक्षित करण्याचे लक्ष्य ठरविले असून त्यासाठी कौशल्य विकास विभागाकडून सुरुवातीस रुपये १० कोटीची तरतूद उपलब्ध नियतव्ययामधून केली जाईल. परिणामस्वरुप, लक्ष्य व निधीवाटप हे वर्षनिहाय केले जाईल.

**ii. सेंटर ऑफ एक्सलेंन्सची स्थापना : महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत** सार्वजनिक-खाजगी-भागीदारी (पीपीपी) मॉडेलवर आधारीत सेंटर ऑफ एक्सलेंन्सची स्थापना करण्यात येईल. सेंटर ऑफ एक्सलेंन्समध्ये फिनिशिंग अकॅडमी कम इन्क्युबेशन सेंटर सुविधेचा समावेश असेल.

**फ) पॅकेज्ड कमॉडीटी नियमांची पुरोगामी व्यवहारीक अंमलबजावणी करणेबाबत :-**

i) **पूर्व—बंद स्वरुपातील वस्तु (Pre-packaged Commodities) च्या वेस्टनावरील लेबल घोषणाबाबत** : किरकोळ व्यापाऱ्यांकडून ज्या वस्तूचा साठा व विक्री होत असलेल्यापैकी, बरेच स्टॉक किपिंग युनिट्स (stock keeping units (SKUs))/ वस्तु (Commodities) हया पूर्व-बंद स्वरुपात असतात ,की ज्या वेस्टनावरील लेबलाची उद्‌घोषणा, लिगल मेट्रोलॉजी अक्ट-२००९ च्या तरतुदी आणि लिगल मेट्रोलॉजी (Packaged Commodities ) नियम, २०११ ची पुर्तता करणाऱ्या असणे आवश्यक आहे. त्यामुळे प्री पॅकेज वस्तुंवर, कायदा व नियमात निर्देशित केल्यानुसार काही उद्‌घोषणा करणे आवश्यक आहे.

ii) सर्वसाधारणपणे किरकोळ व्यापारी आणि संघटित किरकोळ व्यापारी अनेक वस्तु शेकडो पुरवठादारांकडून खरेदी करतात. यापैकी काही वस्तुंवर /उत्पादनांवर बंधनकारक असलेल्या सर्व आवश्यक उद्‌घोषणा नसतील किंवा त्यात काही छपाईचे दोष असण्याची शक्यता असते. हे उत्पादक, आयातदार किंवा पॅकिंग करणारे यांच्याबाजूने घडत असते.

iii) वेस्टनावर बंधनकारक असलेल्या उद्‌घोषणा नसल्यास ते ग्राहकाच्या हिताच्या दृष्टीने हानिकारक ठरु शकते. अशा प्रकरणी तार्कीकदृष्टया (logically) नियमांचा भंग केलेल्या अपराधाची जबाबदारी उत्पादक, आयातदार अथवा पॅकींग करणारे यांचेवर असणे योग्य ठरेल. कारण उत्पादनाच्या वेस्टनावरील कायद्याने बंधनकारक असलेल्या उद्‌घोषणेची छपाईबाबतचा पूर्ण नियंत्रण, वर नमूद केलेल्यांकडे असणार आहे.

iv) लिगल मेट्रोलॉजी अक्ट-२००९ च्या कलम ५३(१) च्या तरतुदीनुसार, राज्य शासनास केंद्र शासनाशी सल्ला-मसलत करुन लिगल मेट्रोलॉजीबाबत नियम तयार करण्याचे अधिकार आहेत.

v) लिगल मेट्रोलॉजी अक्ट-२००९ च्या सेक्शन ३६ तरतुदीनुसार Onus / actions / fines for non-compliance बाबतच्या यथायोग्य अधिसूचना राज्य शासन निर्गमित करेल आणि त्या अंतर्गत तयार करण्यात आलेल्या नियमांनुसार, उत्पादक /पॅकींग करणारे / आयातदार यांचेवर कारवाई करण्यात येईल. तद्‌नंतर प्रथम किंवा त्यानंतर पुन: गुन्हे केल्यास घाऊक विक्रेता /किरकोळ विक्रेता यांचेवर कारवाई करण्यात येईल. ज्या घाऊक /किरकोळ विक्रेत्याकडे सदरचा माल सापडला असेल किंवा जप्त केला असेल त्याला प्रस्तुत प्रकरणातील पक्षकार किंवा साक्षीदार केले जाईल, ज्यामुळे उत्पादक /पॅकींग करणारे / आयात करणारे यांचे विरुध्द गुन्हा दाखल करता येईल.

सिंगल-ब्रँड विक्रेत्यांकडे संपूर्ण पुरवठा साखळीची मालकी असते आणि अनेकदा विक्री करण्यात येणाऱ्या मालाचे ते उत्पादक, पॅकर, आयातदार आणि घाऊक विक्रेता असतात. त्यामुळे सिंगल-ब्रँड रिटेल संस्थेच्या विविध भागातील आउटलेट्‌सना एकाच गुन्हयासाठी शिक्षा न करणे महत्वाचे आहे. जे सिंगल ब्रँड वातावरणातील स्टोअर्स अनुपालन करणार नाहीत त्यांना जबाबदार धरले जाईल.

## ग) किरकोळ व्यापार मनोरंजन क्षेत्र (REZ)

सन २०१३ मध्ये देशातील संघटित किरकोळ व्यापार क्षेत्राचे बांधीव क्षेत्र ०.४७ दशलक्ष चौ. मी. इतके होते. सन २०१२ मध्ये असलेले बांधीव क्षेत्र जे ०.२५ दशलक्ष चौ.मी. होते त्याच्याशी तुलना करता एकूण मॉल बांधीव क्षेत्रातील वाढ ७८% इतकी झाल्याचे दिसून येते. संघटित किरकोळ विक्रेत्यांची जागेसाठीची मागणी सातत्याने वाढत असल्याचे दिसते.

किरकोळ विक्रीस (Retail) "अत्यावश्यक सुविधा" म्हणून गणण्यात येईल. प्रादेशिक योजना / विकास योजनांमध्ये किरकोळ क्षेत्र अधिक परवडणारे होण्यासाठी ज्याप्रमाणे अत्यावश्यक सेवा आणि रेस्टॉरंट्स

यांच्यासाठी आरक्षण असते त्याप्रमाणे किरकोळ क्षेत्र आणि मनोरंजन यांच्यासाठी  क्षेत्र राखून ठेवण्यात येईल.

शहर विकासाच्या धोरणामध्ये सध्या  बाजारपेठ  तसेच नागरिकांचे मनोरंजन (recreational) या गरजा पूर्ण करण्याकरिता स्पष्टपणे क्षेत्र राखीव  ठेवण्यात येत नाही. त्यामुळे दुकानांची मांडणी अस्ताव्यस्त झाल्याचे दिसून येते. आणि महत्वाचे म्हणजे, वाणिज्य वापरासाठीच्या क्षेत्रामधील जागेकरिता घडपड असून, सदरची जागा खूपच महाग असल्याने त्या किरकोळ विक्रेत्यांसाठी (untenable) किफायतशीर ठरत आहेत.

शहरातील रहिवाशी, वाणिज्यिक, औद्योगिक, दुकाने व मनोरंजनाच्या भागाचा समतोल साधण्याच्या दृष्टीने दुकाने व मनोरंजन क्षेत्राची असलेली गरज राज्य शासनाने ओळखली आहे. सार्वजनिक परिवहन सेवेशी थेट मार्गाने किरकोळ विक्रेत्यांच्या क्षेत्राला जोडण्याचे प्रयत्न केले जातील. त्यासाठी दिर्घकालीन वाहतुकीचे नियोजन करण्यात येईल. संपूर्ण वर्षभर वीज, पाणी, गॅस, सांडपाण्याची व्यवस्था व इंटरनेट जोडणी देण्याची व्यवस्था त्याद्वारे करता येईल.

किरकोळ व्यापार आणि मनोरंजन याकरिता झोन तयार केल्यास, किरकोळ विक्रीत वाढ होईल आणि मुख्यत्वे नागरिकांचे जीवनमान उंचावण्यास मदत होईल.

किरकोळ व्यापार उद्यान हे विशाल विकसित किरकोळ व्यापारी क्षेत्र असून, जेथे मोठे  किरकोळ व्यापारी व इतर किरकोळ व्यापारी यांनी एकत्रितपणे निर्माण केलेले संपूर्ण कुटुंबासाठी एक दिवसाचे पर्यटनाचे स्थळ होय. शहर विकासाच्या बृहतआराखडया अंतर्गत, महाराष्ट्रातील किरकोळ व्यापार उद्यानाची संकल्पना विचारात घेतली जाईल, त्यामुळे ग्राहकांना अधिक पर्याय उपलब्ध होण्यात मदत होईल आणि स्पर्धाही वाढेल. वस्तुंच्या किंमती कमी होण्यास आणि शहरातील वेगवेगळया भागातील विक्रेत्यांची तुलना करण्यासाठी कराव्या लागणाऱ्या प्रवासाकरिता होत असलेल्या खाजगी वाहनांच्या वाहतुकीस देखील आळा बसु शकेल. हे किरकोळ व्यापार उद्यान शक्यतो मुख्य महामार्गाच्या जवळ आणि सार्वजनिक वाहतुक व्यवस्थेशी जोडलेले असावे. यामुळे ग्राहकांना जोडण्यास मदत होईल. शहराच्या आतील व सभोवतीची वाहतुक सुरळीत होईल,  ती ग्राहकांच्या सोयीनुसार होईल व त्यामुळे पर्यावरणपुरक व स्वच्छ शहर निर्माण होईल.

**ग) (१) प्रादेशिक /नगर नियोजन आराखड्यात किरकोळ व्यापारासाठी स्वतंत्र क्षेत्राची (Zone) तरतूद करणे :** दिल्ली शहरातील दक्षिण व उत्तर दिल्ली मध्ये किरकोळ व्यापाऱ्यांकरिता स्वतंत्र जागा राखून केंद्र उभारले आहे त्याधर्तीवर राज्यातील शहरांच्या नगर नियोजन आराखड्यात किरकोळ व्यापाराच्या विकासासाठी आरक्षित भूखंड राखून ठेवला जाईल. त्यासाठी नगरपरिषद क्षेत्रामध्ये किमान १२ मीटर रस्ता रुंदी व महानगरपालिका क्षेत्रामध्ये किमान १५ मीटर रस्ता रुंदीची अट राहील. यामुळे किरकोळ व्यापार उद्योगास खालील प्रमाणे मदत होईल.

i) मोठया आंतरराष्ट्रीय दर्जाच्या मॉलकरिता शहर विकास आराखडयात मोठया जमिनक्षेत्राची आवश्यकता असते व त्याकरिता शहर विकास आराखडयात अशा जागा निश्चित केल्या तर त्यामुळे विकासाचा दर्जात वाढ होईल.

ii) किरकोळ व्यापार / मनोरंजन विकासाकरिता जागांची निश्चिती केल्यामुळे जमिनीच्या किंमतीचे सुसंगतीकरण होवून त्याची किरकोळ व्यापाराच्या विकासाकरिता मदत होईल.

iii) रस्ते, सार्वजनिक वाहतुक व्यवस्था, ऊर्जा व इतर आघाड्यांवरील सुविधा, अशा पायाभूत सुविधांचे आगाऊ (in advance) नियोजन करता येईल.

## ग) (२) विकास नियंत्रण नियमावली (DCR) :

किरकोळ व्यापाराचा विकास हा मुख्यत्वे करुन मंजूर विकास योजनेतील वाणिज्यिक आस्थापनांसाठी तयार करण्यात आलेल्या निकषांनुसार करण्यात येतो. वास्तविक पाहता , किरकोळ व्यापाराच्या विकासाकरिता व्यवसायाचा जागेचा वापर व गरज हे पूर्णत: वेगळे आहेत त्यामुळे अशा विशिष्ट व्यापारीक गरजांचा समावेश करणे आवश्यक आहे. त्यानुसार किरकोळ व्यापारकेंद्राची व्यवहार्यता व गुणवत्तेच्या वाढीव विकास होण्यासाठी खालीलप्रमाणे सुधारणा विकास नियंत्रण नियमावलीत करण्यात येतील.

**i)** **तळ जागेचा जास्तीत जास्त वापर:** मॉलमध्ये जरी वेगवेगळया मजल्यावर विविध किरकोळ व्यापारी भाग उभारले जात असले तरी ग्राहकांची वर्दळ वरच्या मजल्यांवर कमी असल्याने वरच्या मजल्यांची उत्पादकता कमी असते. त्यामुळे किरकोळ व्यापाराचा विकासासाठी तळ मजल्यावरील जवळपास ७०% पर्यंत जागेचा वापर करण्यास परवानगी देण्यात येईल. प्रचतलित चटईक्षेत्र निर्देशांक निकष, अग्नीसुरक्षा नियमावली तसेच सेटबॅक नियमावलीचा भंग न करण्याच्या अटीबाबत संबंधित नियोजन प्राधिकरणाकडून याबाबत कार्यवाही केली जाईल.

ii) **मनोरंजनासाठी मैदान** : संघटित खेळाडूंकडून किरकोळ व्यापाराच्या वातावरणात वाणिज्यिक तत्वावर विविध मनोरंजक सुविधांचे आयोजन केले जाते. अशा सुविधा व क्रियां लागू असलेले नियम पाळण्याच्या अटीवर ग्राहकांच्या मनोरंजन मैदानाच्या जागेत करु देण्यास परवानगी देण्यात येईल. तथापि या मैदानावर वरील प्रयोजनाव्यतिरिक्त अन्य कोणताही वापर अनुज्ञेय राहणार नाही.

iii) **मजला ते मजला उंची :** किरकोळ व्यापार विकास क्षेत्र हे सार्वजनिक क्षेत्र असल्यामुळे, तेथे गर्दी असते. मजल्या मधील जास्त उंचीमुळे (देण्यात आलेल्या परवानगीमुळे) सामाईक जागा व दुकाने प्रशस्त दिसतील. त्यामुळे ग्राहकांना

मोकळे व आरामदायक खरेदी वातावरण निर्माण होईल. इतर अनेक राज्यांमधील देण्यात आलेल्या अनुमती प्रमाणे मजल्यागणिक उंचीची मर्यादा ५.५मी .पर्यंत वाढविण्याबाबत संबंधित नियोजन प्राधिकाऱ्याची क्षमता विचारात घेऊन क्षेत्रनिहाय निकष तयार करण्यात येतील.

iv) **पार्किंगचे नियम** : ठिकाण व आकारमानानुसार मॉलमध्ये, मोठ्या प्रमाणात वाहने असतात. वाहनतळासाठीच्या मर्यादित जागेमुळे मॉलमध्ये येणाऱ्या लोकांची संख्या कमी होते. तसेच आजूबाजूच्या विकसित भागाभोवती वाहतुकीची कोंडी निर्माण होते त्यामुळे तेथे राहणाऱ्या नागरिकांना असुविधेचा त्रास सहन करावा लागतो. सध्याच्या पार्किंगच्या नियमानुसार नियमापेक्षा जास्तीचे पार्किंग, चटईक्षेत्र निर्देशाकांमध्ये गणले जाते. यात बदल करुन अतिरिक्त पार्किंगचे चटई क्षेत्र निर्देशांकात समाविष्ट न करता किरकोळ व्यापाराच्या विकासाकरिता मोठया प्रमाणावर पार्किंगची सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत प्रचलित नियमात सुधारणा करण्यात येईल.

v) **सेवा** : कार्यालयीन जागेच्या उलटपक्षी किरकोळ व्यापाराला दिवसभर मालाची वाहतुक आणि ग्राहकांच्या येण्या-जाण्यासाठी जादा सेवा उपलब्ध करुन द्यावी लागते. ग्राहकांना सतत उत्तम सेवा देता यावी म्हणून व्यापाऱ्यास त्याचा माल भरत रहावा लागतो. त्यामुळे मॉलमध्ये मालाच्या साठवणुकीकरिता जास्त जागा लागते. मॉलमध्ये मोठया प्रमाणात येणाऱ्या ग्राहकांच्या सुलभतेकरिता जास्त क्षमतेचे स्वयंचलित जिने व लिफ्ट यांची व्यवस्था करावी लागते. त्यामुळे इमारतीच्या (मॉल) तळघरात साठवणुकीच्या जागेसह १५% इतक्या जागेचा विकास विविध सेवांसाठी करण्यास मुभा दिली जाईल. याबाबत प्रचलित नियमात सुधारणा करण्यात येईल.

vi) **बदल** : किरकोळ व्यापाराकरिता लागणाऱ्या जागेची गरज परिसरात असलेल्या ग्राहकांच्या डेमोग्राफीक प्रोफाईल नुसार बदलत असते. त्यांची गरज भागविण्याकरिता मॉलमधील दुकानाची एकत्र विभागणी करणे किंवा त्यांचे एकत्रिकरण करणे आवश्यक असते. त्याचप्रमाणे, वेगवेगळया जागांच्या वापरात बदल होत राहतो. उदा :- फॅशनेबल कपडयांच्या दुकानांऐवजी, हॉटेल किंवा करमणुकीचे साधन किंवा उलटपक्षी त्याचा वापर होऊ शकतो. या पूर्वी मंजूरी दिलेली किरकोळ व्यापाराची जागा किंवा इतर उपयोगाची जागा हे बदल त्यांचे एकत्रिकरण व विभागणी किंवा सुधारित सोप्या मंजूरीच्या प्रक्रियेनुसार त्या अंतर्गत बदल करण्यास सुलभतेने परवानगी संबंधित नियोजन प्राधिकाऱ्याकडून दिली जाईल. याबाबत प्रचलित नियमात सुधारणा करण्यात येईल.

vii) **इमारतीची उंची** : मल्टीप्लेक्स किवा ऑडीटोरियमकरिता इमारतीची उंची जास्तीत जास्त ३० मीटरपर्यंत असावी असे बंधन घालण्यात आले आहे. सर्वसाधारणपणे किरकोळ व्यापारी वरच्या मजल्यांवर काम करीत नाहीत, म्हणून संपूर्ण अनुज्ञेय असलेल्या चटईक्षेत्र निर्देशांकाचा वापर करण्याकरिता पर्यायी वापर म्हणून तेथे हॉटेल, सेवा गृह, कार्यालय यांची उभारणी वरच्या मजल्यावरील जागेत करणे गरजेचे असते. शेजारील राज्याप्रमाणे इमारतींच्या उंचीवरील निर्बंध अग्नी संदर्भातील निकष व नियोजन प्राधिकरणाची क्षमता लक्षात घेऊन शिथिल करण्यात येतील.

**ग) (३) किरकोळ व्यापारी क्षेत्राकरिता अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक** : किरकोळ व्यापार केंद्राच्या विकासाचा दर्जा व उपयुक्तता वाढविण्याकरिता, स्वतंत्र भूखंडावरील केवळ किरकोळ व्यापारी क्षेत्र शॉपिंग सेंटर करिता प्रचलित रेडी रेकनर दरानुसार संपूर्ण अधिमुल्य भरण्याच्या अटीवर मूळ चटईक्षेत्र निर्देशांकावर ५०% अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक अनुज्ञेय करण्यत येईल. संयुक्त वापराकरिता सदर अतिरिक्त चटईक्षेत्र निर्देशांक अनुज्ञेय राहणार नाही.

**ह) वितरण केंद्रे ही सेवा-उद्योगाशी समकक्ष समजले जातील :**

विक्रेते आणि व्यापाऱ्यांद्वारे वापरल्या जाणा-या वखारी आणि वितरण केंद्रेही, उद्योग आणि व्यापार उदिमास मदत करणारी आहेत. ते रोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देतात. एक मजबूत आणि कार्यक्षम लॉजिस्टीक सेटअप विकसित होण्यासाठी या आस्थापनांचे प्रवर्तन करणे गरजेचे आहे. असे सेटअप अपव्यय कमी करण्यास मदत करतील. राज्यातील किरकोळ व्यापार आणि उपभोग याची दखल घेणे हा या क्षेत्राचा आवश्यक कणा आहे. वितरण केंद्रे ही, सेवा उद्योगाच्या समकक्ष समजली जातील.

संघटीत किरकोळ क्षेत्रात अनेक उद्योग संस्थांचा होणाऱ्या प्रवेशामुळे भारतीय गोदामाचे परिदृश्य पुर्नव्याख्यित होत असून 'गोदामाची फक्त चार - भिंती आणि शेड' अशी असलेली पारंपरिक संकल्पना बदलून त्याचे आधुनिक सेटअप मध्ये परिवर्तन होत आहे. अशा सेटअप मध्ये उत्पादनातील (विशेषत: खाद्यपदार्थातील) अपव्यय कमी करुन साठयाचे चांगले चलनवलन अशा सुविधा निर्माण होत आहेत. हे उच्च दर्जाच्या ऑटोमेशन मल्टि-रॅक, पॅलेटायझेशन व इन्फ्रास्ट्रक्चर इ. मुळे साध्य होऊ शकते. मात्र यासाठीच्या सुविधांकरिता जागेची पूर्व-उपलब्धी असणे हे प्रथम आवश्यक आहे. सद्या अशा जागा मिळणे सोपे नाही कारण पर्याय म्हणून उपलब्ध असलेली अशी गोदामे ही वाणिज्यिक मालमत्ता (Commercial Properties) असून तेथे जागेचे उच्च दर, कर व लेव्ही आकारली जाते. जो पर्यंत वितरण केंद्रांची स्थापना उद्योग स्थापनेप्रमाणे समजली जात नाही तो पर्यंत हा प्रश्न सोडविला जाऊ शकत नाही.

रिटेल स्टोअरमधील मालाच्या विक्रीत कृषी उत्पादनाचा लक्षणीय वाटा व योगदान असल्यामुळे संघटित किरकोळ विक्रेत्यांना शेतजमीनीवर गोदामे उभी करण्यासाठी शासन परवानगी देईल.

शासन खाजगी-सार्वजनिक-भागिदारी (पीपीपी) आधारावर जागतिक दर्जाच्या गोदाम स्थापनेस प्रोत्साहन देईल.

**ई) कृषी उत्पन्न बाजार समिती विनियमातून सूट :**

रिटेल स्टोअरमधून विक्री होणाऱ्या व्यापारी मालात कृषी उत्पादनाचा लक्षणीय वाटा असल्याचे दिसून येते. कृषी उत्पादने, कृषी उत्पन्न बाजार समिती (APMCs) मार्फत मिळविण्यास विलंब होतो तसेच फळे आणि भाज्या यासारख्या कृषी उत्पादनाची गुणवत्ता आणि शेल्फ लाईफ कमी होते आणि त्यांच्या खरेदीचा खर्च वाढतो. कृषी उत्पन्न बाजार समिती अधिनियमानुसार शेतकरी त्यांच्या उत्पादनाची विक्री थेट किरकोळ विक्रेत्यांना करु शकत नाही. कृषी उत्पन्न बाजार समिती अधिनियमात योग्य सुधारणा केली जाईल जेणे करुन शेतकरी कृषी उत्पन्न बाजार समितीमार्फत शेतमालाची विक्री करण्यास बंधन राहणार नाही. शेतकरी त्यांच्या भाज्या व फळांची विक्री थेट किरकोळ विक्रेत्यांना करु शकतील. कृषी उत्पन्न बाजार समिती या विक्रीसाठी कोणत्याही कराची आकारणी करणार नाही.

ज्या शेतकऱ्यांना त्यांच्या शेतमालाची विक्री कृषी उत्पन्न बाजार समितीमार्फत करावजाची असेल त्यांना तसे स्वातंत्र्य राहील.

**ज) माथाडी कायद्याची स्पष्ट परिचालन मार्गदर्शक तत्वे तयार करणे :**

महाराष्ट्र राज्यातील काही आस्थापनामध्ये नेमणूक करण्यात आलेल्या असंरक्षित, हातांनी कामे करणाऱ्या कामगारांची नेमणूक नियमित (Regulate) करण्याकरिता माथाडी कायदा अस्तित्वात आला आहे. सध्या किरकोळ व्यापारदारांनी किरकोळ व्यापाराची विविध कार्ये करण्यासाठी, जसे किरकोळ दुकाने आणि वितरण केंद्रांमध्ये व्यापारी मालाचे लोडींग / अनलोडींग करण्यासाठी, कामगारांची नेमणूक करतात. ते संरक्षित कामगार असून एक तर ते किरकोळ विक्रेत्याचे कर्मचारी असतात किंवा अधिकृत कंत्राटदारांकडून नेमले जातात.

महाराष्ट्र माथाडी, हमालआणि इतर श्रमजीवी कामगार ( रोजगार नियमन व कल्याण ) १९६९ च्याकलम २२ अन्वये देण्यात आलेल्या शक्तीचा वापर करुन राज्यशासन किरकोळ उपक्रमांना खालील अटींची पूर्तता करण्याच्या अटीवर सदर अधिनियमातील तरतुदी लागू करण्यापासून सूट देण्यात येईल.

i) वरील वर्गवारीतील आस्थापना या कामगारांना त्यांच्या हजेरीपटावर स्थायी कामगार म्हणून नेमतील. हे कामगार संरक्षित असून त्यांना माथाडी कायदयामधील तरतुदीपेक्षा चांगले लाभ मिळतील.

ii) वरील वर्गवारीतील आस्थापनामध्ये काम करत असलेल्या कंत्राटी कामगारांना स्थायी कामगार म्हणून नेमून कामगार कायद्याच्या विविध कलमांखाली सर्व फायदे मिळतील. त्यामुळे त्यांना माथाडी कायदयामधील तरतुदीपेक्षा चांगले लाभ मिळतील.

**ख) व्यापारी आस्थापनेच्या नावे दर्शविणाऱ्या दुकानाचे चिन्हफलक (Sign Board ) लावण्यासाठी परवानगी देणे:**

मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ तसेच महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम व महाराष्ट्र नगरपरिषद व नगरपंचायत अधिनियम १९६५ नुसार, जमिनीवर अथवा पृष्ठ भागावर अथवा उभे करण्यात आलेले बांधकाम / किंवा इमारतीचा छप्पराचा काही भाग किंवा कुंपणावर (पॅरापेट) जाहिरात फलक लावण्यासाठी महापालिका आयुक्तांची अथवा नगरपालिका मुख्याधिकाऱ्यांची अथवा नियोजन प्राधिकाऱ्याची परवानगीची आवश्यक आहे. सदर जाहिरात फलकावरील प्रदर्शित करण्यात येणारी वर्ण, अक्षरे किंवा चित्रांसह आणि आवश्यक त्या निश्चित केलेल्या फी सह सादर करणे आवश्यक असते.

किरकोळ दूकानदारांना स्वत:च्या व्यवसायासंदर्भातील जाहिरातीसाठी प्रामुख्याने स्काय-चिन्हांचा वापर करावा लागत असेल व असे स्काय-चिन्ह जर किरकोळ दूकानदारांच्या मालकीच्या जागेत, भाडेपट्टयाच्या जागेत अथवा गहाण ठेवलेल्या जागेत उभारलेली असल्यास त्यास आयुक्तांची अथवा मुख्याधिकाऱ्यांची अथवा नियोजन प्राधिकाऱ्याची परवानगीची तसेच शुल्क भरण्याची आवश्यकता राहणार नाही. तथापि किरकोळ दुकानदाराने स्वत:च्या व्यवसायाशी संबंधित बाब वगळता अन्य बाबींची जाहिरात करता कामा नये

**–ल) ओपन अक्सेस व्दारे वीज मिळण्यासाठी परवानगी देणे :**

आधुनिक रिटेल आऊटलेट्सांना मोठया प्रमाणात वीजेची आवश्यकता असते. व्यापाराच्या एकूणच परिचालनावर वीजबिलाचा परिणाम होतो. १ मेगावॅट पेक्षा जास्त वीजेची गरज असलेल्या किरकोळ विक्रेत्यांच्या आस्थापनांना (retail trade setups) ओपन अक्सेसव्दारे वीज मिळण्यासाठी परवानगी दिली जाईल.

**म) धोरण अंमलबजावणीसाठी व्यवस्थापनाची चौकट :**

**(१). शक्तिप्रदान समितीचे गठण:** राज्यस्तरावर या धोरणाच्या अंमलबजावणीचे संनियंत्रण करणे. आणि आवश्यकतेनुसार कार्यपध्दती व नियमावली तयार करण्यासाठी एक शक्तिप्रदान समिती गठण करण्यात येईल. सदर शक्तिप्रदान समितीची रचना पुढीलप्रमाणे असेल:

i) मुख्य सचिव- अध्यक्ष
ii) प्रधान सचिव (उद्योग)- सदस्य
iii) प्रधान सचिव (नगरविकास-१) - सदस्य
iv) प्रधान सचिव (कौशल्य विकास)-सदस्य
v) प्रधान सचिव (कामगार)- सदस्य
vi) प्रधान सचिव (अन्न व नागरी पुरवठा)- सदस्य
vii) प्रधान सचिव (महसूल)- सदस्य

viii) सचिव (नगरविकास-२)-सदस्य

ix) राज्यातील सक्रीय रिटेलर्स असोसिएशनचे तीन नामनिर्देशीत प्रतिनिधी - सदस्य

x) विकास आयुक्त (उद्योग)- सदस्य सचिव

**(२) शक्तिप्रदान समितीची सनद:**

धोरणातील खालील बाबींची अंमलबजावणी व समन्वयाकरिता शक्तिप्रदान समितीव्दारे एक कार्यबळ समिती स्थापन करण्यात येईल:

अ) रिटेल झोनचे प्रवर्तन (Promotion & Retail Zones )

ब) हरित रिटेलचे प्रवर्तन ( Promotion & Green Zones)

क) व्यवसाय सुलभीकरणाच्या( Ease of doing business) संदर्भातील कायदे व नियमात बदल करण्यासपुढाकार

ड) मानव संसाधन विकास

इ) प्रशासकीय उपाययोजना

**६. धोरणाची प्रयोज्यता व वैधता (Applicability & Validity)**

हे धोरण अस्तित्वात आल्यानंतर सुरु होणाऱ्या नवीन किरकोळ व्यवसायांना अनुज्ञेय असेल. सदर धोरणाचा वैधता कालावधी धोरण लागू झाल्यापासून ५ वर्षाकरिता असेल.

*************

**शासन निर्णय क्रमांक किविधो-२०१५/(प्र.क्र.११३)/उद्योग-२, दिनांक १० फेब्रुवारी, २०१६ सोबतचे विवरणपत्र**

| परिशिष्ट -२ | | | |
|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **सोबतच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक** | **कार्यवाही विषय** | **कार्यवाही अपेक्षित संबंधित विभागाचे नाव** |
| १ | ३.२ | दूकाने व आस्थापना अधिनियमातील तरतूदी शिथील करणे. | **कामगार विभाग** |
| | ३.२ (अ) | हजेरी आणि वेतनविषयक नोंद-वहया ठेवण्यातून सूट देणे, कर्मचाऱ्यांच्या संबंधातील अभिलेखे तसेच कामगार विभागाच्या संगणीकरणाच्या प्रगतीला अनुसरुन विविरणपत्रे इलेक्ट्रॉनिक स्वरुपात ठेवण्याची तरतूद करणे. | |
| | ३.२ (ब) | ज्या लघु व मध्यम किरकोळ व्यापाऱ्यांच्या आस्थापना स्वयंरोजगारीत (Self employed) असतील, अथवा ज्या आस्थापनामध्ये नऊ (९) पेक्षा कमी कामगार कार्यरत असतील अशा आस्थापनांसाठी सुलभता करणे | |
| | | १) दुकाने व आस्थापना अधिनियम १९४८ अंतर्गत ऑनलाईन नोदणी (Online Registration) ची सुविधा देण्यात येईल. याकरिता तपासणी (Inspection) अथवा कामगार कायद्यान्वये अन्य मंजूरीची आवश्यकता राहणार नाही.<br>३) एखादया प्रकरणात विशिष्ट स्वरुपाची तक्रार प्राप्त झाल्यास, जिल्हास्तरीय अधिकारी यांचे पूर्व मान्यतेशिवाय कामगार विभाग, विक्रीकर विभाग इत्यादी विभागाकडून दूकानांची सर्वसाधारण तपासणी (Inspection) केली जाणार नाही. | |
| | ३.२ (क) | वार्षिक विवरणपत्रे स्व-प्रमाणित करण्याचा आणि एकत्रित दाखल करण्याचा पर्याय निवडण्यास मुभा देणे. | |
| | ३.७ | माथाडी कायद्याची स्पष्ट परिचालन मार्गदर्शक तत्वे तयार करणे. | |
| | ३.९ | गृहिणी आणि विद्यार्थ्यांना अर्धवेळ कामावर नेमणूक करण्यास मान्यता देणे. | |
| | ३.२ (ब) | ज्या लघु व मध्यम किरकोळ व्यापाऱ्यांच्या आस्थापना स्वयंरोजगारीत (Self employed) असतील, अथवा ज्या | **वित्त विभाग** |

| | | | |
|---|---|---|---|
| | | आस्थापनामध्ये नऊ (९) पेक्षा कमी कामगार कार्यरत असतील अशा आस्थापनांसाठी सुलभता करणे | |
| | | २) मूल्यवर्धित कर (Vat) ची नोंदणी देखील (Online ) पध्दतीने देण्यात येईल. त्यासाठी तपासणी (Inspection) ची आवश्यकता राहणार नाही.<br>३) एखादया प्रकरणात विशिष्ट स्वरुपाची तक्रार प्राप्त झाल्यास, जिल्हास्तरीय अधिकारी यांचे पूर्व मान्यतेशिवाय कामगार विभाग, विक्रीकर विभाग इत्यादी विभागाकडून दूकानांची सर्वसाधारण तपासणी (Inspection) केली जाणार नाही. | |
| २ | ३.३ | खाद्य व किराणा व्यवसायातील फक्त नाशवंत मालाचा समावेश अत्यावश्यक सेवेमध्ये अंतर्भाव करणे. | **सामान्य प्रशासन विभाग** |
| ३ | ३.४ | अन्न व नागरी पुरवठा मंत्रालय अत्यावश्यक वस्तु अधिनियमांतर्गत जारी केले आदेश निरसित करणे किंवा विनिर्दीष्ट साठवणूक मर्यादेत वाढ करणे. | **अन्न व नागरी पुरवठा** |
| ४ | ३.५ | राज्यातील करकोळ उद्योजकांना सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी समन्वय अधिकाऱ्याची नेमणूक करणे. | **उद्योग विभाग** |
| ५ | ३.६ | कृषी उत्पन्न बाजार अधिनियमात सुधारणा करणे. | **पणन विभाग** |
| | ६ | वितरण केंद्रे ही सेवा उद्योगाच्या समकक्षात आणणे. | |
| | ६.१ | किरकोळ विक्रेत्यांना शेतजमीनीवर गोदामे उभी करण्यास परवानगी देणे. | |
| े | ३.८ | दुकानाचे फलक लावण्यास परवानगी देणे | **नगर विकास विभाग (नवि-२)** |
| ६ | ४ | धोरणात नमूद केलेल्या बाबींना नियमित योजनांमधून वित्तिय सहाय्यासह मान्यता देणे. | **कौशल्य विकास व उद्योजकता विभाग** |
| ७ | ५, | शहर विकास आराखडयामध्ये किरकोळ क्षेत्राच्या संदर्भात विशेष तरतुदी करणे. | **नगर विकास विभाग (नवि-१)** |
| | ५.१ | शहर विकास आराखडयामध्ये किरकोळ क्षेत्र आणि मनोरंजन यासाठी विविक्षित क्षेत्र राखून ठेवणे. | |
| | ५.२ | किरकोळ व्यापारासाठी स्वतंत्र क्षेत्राची तरतूद करणे, तसेच विकासासाठी भूखंड आरक्षित ठेवणे. | |
| | ५.३ | विकास नियंत्रण नियमावलीत सुधारणा करणे. | |
| | ५.४ | किरकोळ व्यापारी क्षेत्र शॉपिंग सेंटर करिता अतिरिक्त चटई क्षेत्र अनुोय करणे. | |
| ८ | ६.२ | किरकोळ विक्रेत्यांच्या आस्थापनांना ओपन ॲक्सेसव्दारे वीज मिळण्यासाठी परवानगी देणे. | **ऊर्जा विभाग** |